घरबांधणी अग्रीम मंजूर करण्याबाबत
डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे,
उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र. एएफओ-१५१९/प्र.क्र.१५५/फ-७अ
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०९ जानेवारी, २०२०.

वाचा :- १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र.एएफओ-१५१९/प्रक्र. १५५/फ-७अ, दि.२३.१०.२०१९.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.घबांअ-२०१२/प्रक्र.३०/२०१२/विनियम, दि.२०.२.२०१५
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.घबांअ-२०१२/प्रक्र.३०/२०१२/विनियम, दि.२४.४.२०१९
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर कार्यालय यांचे पत्र क्र.कक्ष-९/गोक/प्रक्र.२८/भाग-३/२७९१/१९-२०, दि.३.१.२०२०.

प्रस्तावना :-

डॉ.जितेंद्र रामगावकर, भावसे, उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांना नागपूर येथे चालू असलेल्या महिंद्रा ब्लूमडेल डेव्हलपर्स लि.नागपूर यांचेकडून ८६.७९ स्क्वेअर यार्ड/मीटरची (७८१ स्क्वेअर फूट) नवीन सदनिका घेण्यासाठी रु.३०,००,०००/- (अक्षरी रुपये तीस लाख फक्त) एवढे घरबांधणी अग्रीम समान तीन हप्त्यात संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.२३.१०.२०१९ अन्वये मंजूर करण्यात आले आहे. सदर रु.३०,००,०००/- च्या घरबांधणी अग्रिमाच्या रक्कमेतून पहिला हप्ता रु.१०,००,०००/- डॉ.जितेंद्र रामगावकर, भावसे यांना मंजूर करण्यात आला होता. तथापि, कोषागार अधिकारी, ठाणे यांचे सेवाथे बिल पोर्टल आज्ञावलीनुसार ३ हप्ते ३०%+४०%+३०% असल्याने मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमाच्या ३०% च्या म्हणजेच रु.९,००,०००/- चे देयक पारीत करुन डॉ.जितेंद्र रामगावकर, भावसे यांना अदा करण्यात आले असून, रु.१,००,०००/- इतकी रक्कम शिल्लक असल्याने घरबांधणी अग्रीमाचा दुसरा हप्ता रु.११,००,०००/- इतके मंजूर करण्याची शिफारस संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केलेली आहे. आता डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे यांनी मागणी केल्यानुसार त्यांना मंजूर घरबांधणी अग्रीमाच्या ४०% मर्यादेत दुसरा हप्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

डॉ.जितेंद्र रामगावकर, भावसे यांना या विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.२३.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घरबांधणी अग्रीमाच्या मंजूर रक्कम रु.३०,००,०००/- मधून पहिला हप्ता रु.१०,००,०००/- इतक्या रक्कमेस मान्यता देण्यात आली होती. आता, श्री. जितेंद्र रामगावकर, भावसे यांना घरबांधणी अग्रीमाचा दुसरा हप्ता (रु.३०,००,०००/- च्या ४०%) रु.१२,००,०००/- (रुपये बारा लाख फक्त) या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात येत आहे. संदर्भाधीन दि.२३.१०.२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील अनुक्रमांक १ ते ११ मधील अटी व शर्ती कायम राहतील.

२. यावर होणारा खर्च "मागणी क्र.सी-१२-७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज-२०१-घरबांधणी अग्रिमे-(००)-(०१) घरबांधणी अग्रीम (७६१० ०१४९) " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्रक्र.३०/२०१/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ अन्वये सुधारीत करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ मधील भाग पहिला, उप विभाग एक मधील मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत नियमांखालील अनुक्रमांक ११ मधील नियम क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे यांना मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमाची दुसऱ्या हप्त्याची रक्कम ज्या कोषागारातून काढण्यात येईल त्याचे नाव, प्रमाणक क्रमांक, धनादेश क्रमांक व रक्कम प्रत्यक्ष वितरीत केल्याची तारीख याबाबतची माहिती कक्ष अधिकारी, फ-७अ कार्यासनास व सहायक संचालक (भावसे/लेखा) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११०१११९४७१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.01.14 10:37:29 +05'30'

**(अरविंद आपटे)**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
६. उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
७. डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे, उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
८. कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सहायक संचालक, भावसे (लेखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
यांना विनंती करण्यात येते की, डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांचे सेवापुस्तकात आवश्यक त्या नोंदी न चूकता घेण्यात याव्यात.
१०. संचालक, विमा संचालनालय, मुंबई.
११. डॉ.जितेंद्र रामगावकर, भावसे यांचे वैयक्तीक नस्ती.
१२. निवड नस्ती, फ-७अ कार्यासन.